**सन २०२४ मधील बकरी ईद सणानिमित्त कुर्बानी देण्यात येणाऱ्या अनुसूचित पशुंच्या कत्तलपूर्व तपासणीचे सेवाशुल्क रू.२०/- प्रति पशु या प्रमाणे आकारणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- डीएएचडी-१४०३४/५१/२०२४ एएच-४ (E-७८२५९५)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक ,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक :- १४ जून, २०२४

**वाचा :-** कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यसाय विभागाचा शासन निर्णय क्र.व्हीएचडी-२०२१/प्र.क्र.१८८/पदुम-४, दि.२३.०५.२०२२.

**प्रस्तावना:-**

मा. उच्च न्यायालय खंडपीठ, मुंबई येथे अल-कुरेशी ह्युमन वेलफेअर असोशिएशन, मुंबई यांनी जनहित याचिका क्र ८८८०/२०२४ च्या संदर्भात अंतरीम अर्ज क्र १७०६४/२०२४ दाखल केला आहे. या अर्जान्वये दि.१७.०६.२०२४ ते दि.१९.०६.२०२४ या कालावधीत साजरी करण्यात येणा-या बकरी-ईद निमित्त कुर्बाणी द्यावयाच्या पशुंच्या कत्तलपुर्व तपासणीचे दर रु.२००/- प्रति पशु यावरुन रु.२०/- प्रति पशु आकारण्यास मान्यता देण्याची मागणी केली आहे.

२. सदर प्रकरणी दि.३१.०५.२०२४ रोजी पार पडलेल्या सुनावणीत मा. उच्च न्यायालयाने वादी यांना "Make representation to the Agriculture, Animal Husbandry, Dairy Development and Fisheries Department, Government of Maharashtra for reduction of said fees charged at the Deonar Abattoir on the occasion of Bakri-Eid this year" असा निर्णय दिला असून, राज्य शासनास "If such a representation is made by the applicants, Which he submits would be made immediately, learned AGP for the State submits, it shall be considered expeditiously and within a reasonable time keeping in mind the date of the festival this year." असेही निर्देश दिले आहेत.

वाचा येथील शासन निर्णय क्र.व्हीएचडी-२०२१/प्र.क्र.१८८/पदुम-४, दि.२३.०५.२०२२. रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित पशुंच्या कत्तलपुर्व तपासणीचे दर रू.२००/- प्रति पशु निश्चित करण्यात आले आहेत. मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार सन २०२४ मध्ये साजऱ्या होणा-या बकरी ईद निमित्त कुर्बाणी द्यावयाच्या अनुसूचित पशुंच्या कत्तलपुर्व तपासणीचे दर रू.२०/- प्रति पशु आकारण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२४ मधील बकरी ईद सणानिमित्त दि. १७ जुन, २०२४ ते २० जुन, २०२४ या कालावधीत महाराष्ट्र प्राणी संरक्षण कायदा, १९७६ (सुधारणा १९९५) अंतर्गत कुर्बानी द्यावयाच्या अनुसूचित पशुंच्या कत्तलपुर्व तपासणीचे दर रू.२००/- प्रति पशु यावरून रू.२०/- प्रति पशु आकारण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१४१६०४४८७५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.06.14 16:20:41 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
६. सर्व आयुक्त, महानगरपालिका.
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
८. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
९. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. पशुसंवर्धन उपायुक्त, गुण नियंत्रण प्रयोगशाळा, गोरेगाव, मुंबई.
११. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त
१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
१३. सर्व मुख्याधिकारी, नगर परिषद / नगर पालिका.
१४. सर्व मुख्याधिकारी, कटकमंडळे.
१५. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, पशुवधगृह, गोवंडी, देवनार.
१६. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (पदुम-४).